हिरण्यकेशी (आंबेओहोळ) मध्यम प्रकल्प, तालुका आजरा जिल्हा कोल्हापूर, द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१७/६५०/( प्र.क्र. १९७/१७)/ मध्यम प्रकल्प**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक :- ०४ फेब्रुवारी, २०१९.**

**संदर्भ**: - १) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचा निर्णय क्रमांक मकृखोविम /(२९८)/(२०७/९८)/मप्र-१ दिनांक १६/१०/१९९८.

२) शासन निर्णय क्रमांक सुप्रमा २००९/८५५/ (२६७/२००९ ) मप्र दिनांक ०८/०१/२०१०.

३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्रमांक मकृखोविम-३/(८९६/२०१५)/प्रशा-३/२४७९ दिनांक १९/०६/२०१७.

४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे पत्र क्रमांक व्यअस-२०१८/प्र.क्र.८७/अर्थसं-२ दिनांक २०/११/२०१८.

**प्रस्तावना**:-

हिरण्यकेशी (आंबेओहोळ) मध्यम प्रकल्प, तालुका आजरा, जिल्हा कोल्हापूर, या प्रकल्पांतर्गत आर्दाळ गावानजीक हिरण्यकेशी नदीखो-यातीलआंबेओहोळ या नाल्यावर ३५.११ दलघमी क्षमतेचे धरण बांधणे प्रस्तावित आहे. सदर प्रकल्प महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंळांतर्गत "उर्वरित महाराष्ट्र" या प्रदेशांतर्गत आहे. प्रकल्पाव्दारे कोल्हापूर जिल्हयामधील आजरा तालुक्यातील १३१० हेक्टर्स व गडहिंग्लज तालुक्यातील २६१५ हेक्टर्स क्षेत्र सिंचनाखाली आणण्याचे नियोजित आहे. अशा प्रकारे प्रकल्पाद्वारे एकूण ३९२५ हेक्टर्स क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे.

हिरण्यकेशी (आंबेओहोळ) मध्यम प्रकल्प, तालुका आजरा जिल्हा कोल्हापूर या प्रकल्पास संदर्भ क्रमांक १ नुसार सन १९९६-९७ चे दरसूचीवर आधारीत रूपये २९.३१ कोटी इतक्या रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर संदर्भ क्रमांक २ नुसार सन २००८-०९ चे दरसूचीवर आधारीत रूपये ११४.९३ कोटी इतक्या रकमेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती.

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांनी संदर्भ क्रमांक ३ अन्वये सन २०१६-१७ चे दरसूचीवर आधारीत रुपये २२७.५४ कोटी किंमतीचा द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मान्यतेस्तव शासनास सादर केला आहे. प्रकल्पाचे लाभ व्यय गुणोत्तर १.४३ येत असून प्रकल्प विहित आर्थिक मापदंडात बसत नाही. सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व्यय- अग्रक्रम समितीसमोर मान्यतेकरिता सादर करण्यात आला होता.

सदर प्रकल्पाची द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता किंमत रूपये २२७.५४ कोटी मान्यताप्राप्त प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता किंमत रूपये ११४.९३ कोटी च्या तुलनेत रूपये ११२.६१ कोटीने जास्त आहे. किंमत वाढीची प्रमुख कारणे पुढीलप्रमाणे आहेत :-

| अनुक्रमांक | बाब | वाढ (रुपये कोटी) |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | दरसूचीतील बदलामुळे | ४१.६८ |
| २ | भूसंपादन किंमतीतील वाढ | ६६.४३ |
| ३ | अपु-या तरतूदीमुळे झालेली वाढ | ०.२१ |
| ४ | नवीन / वगळलेल्या तरतुदी | १२.५४ |
| ५ | इतर कारणामुळे झालेली वाढ | २.४० |
| ६ | अनुषंगिक खर्चातील वाढ | (-)१०.६४ |
| | **एकूण वाढ** | **११२.६२** |

प्रकल्पाचा संकल्पित पाणीसाठा ३५.११ दलघमी असून एकूण पाणीवापर ३२.३९५ दलघमी इतका आहे. या प्रकल्पाव्दारे कोल्हापूर जिल्हयामधील आजरा तालुक्यातील १३१० हेक्टर्स व गडहिंग्लज तालुक्यातील २६१५ हेक्टर्स क्षेत्र सिंचनाखाली आणण्याचे नियोजित आहे. अशा प्रकारे प्रकल्पाद्वारे एकूण ३९२५ हेक्टर्स क्षेत्र सिंचनाखाली आणण्याचे नियोजित आहे.

व्यय- अग्रक्रम समितीने दिनांक ०५/११/२०१८ रोजी झालेल्या बैठकीत हिरण्यकेशी (आंबेओहोळ) मध्यम प्रकल्पाच्या सन २०१६-१७ दरसूची वर आधारित रुपये २२७.५४ कोटी किंमतीच्या द्वितीय सुधारित प्रकल्प अहवालास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

शासनाच्या या निर्णयाव्दारे हिरण्यकेशी (आंबेओहोळ) मध्यम प्रकल्पाच्या सन २०१६-१७ च्या दरसूचीवर आधारित रुपये २२७.५४ कोटी इतक्या किंमतीच्या द्वितीय सुधारित प्रकल्प अहवालास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रूपये २१९.०२ कोटी कामाप्रित्यर्थ व रुपये ८.५२ कोटी अनुषंगिक खर्चासाठी तरतूद आहे. उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा सोबत जोडण्यात येत आहे.

२. या योजनेस प्रदान केलेली द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अनुक्रमांक ०३/२०१९ वर नोंदवण्यात आली आहे.

३. सदर प्रकल्पाचे उर्वरित काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

४. या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधा-यावरील भांडवली खर्च ०३, मध्यम पाटबंधारे प्रकल्प (वाणिज्यिक) हिरण्यकेशी (आंबेओहोळ) मध्यम पाटबंधारे प्रकल्प (योजनांतर्गत) या लेखाशिर्षाखाली खर्च टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५.१) राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील मुद्दा क्र. २६ व २७ मधील निरीक्षणांची पूर्तता करावी.

५.२) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.

५.३) प्रकल्पाचे काम नियोजनानुसार व सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

५.४) प्रगतीपथावरील निविदांची कामे प्राधान्याने पूर्ण करण्यात यावी. पाणीसाठ्याचा सिंचनाकरिता जास्तीत जास्त लाभ होईल अशाप्रकारे उर्वरित कामांचा प्राधान्यक्रम निश्चित करण्यात यावा व त्यानुसार कामे / निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

५.५) संपूर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणी वापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणी वापर संस्थेस हस्तांतरित करावे.

५.६) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वितीकरणाच्या विविध टप्प्यांवर क्षेत्रिय अधिका-यांनी घेतलेल्या विविध निर्णयास व क्षेत्रिय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती असल्याचे गृहीत धरता येणार नाही.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४२/का.१४३४ दिनांक ३०/०६/२०१८, वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक १५७/व्यय-१२, दिनांक १३/०७/२०१८ व संदर्भीय पत्र क्रमांक ४ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या व्यय- अग्रक्रम समितीच्या दिनांक ०५/११/२०१८ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०२०४१४३८१८६३२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: CN = Dharane Mallikarjun Irappa, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2019.02.04 14:41:44 +05'30'

**सहपत्र :- उपशीर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**

(म.ई.धरणे)
शासनाचे उप सचिव

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१३) मुख्य अभियंता (द.व प्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
१५) उपसचिव (मो.प्र-१/ मो.प्र-२/जसं/निवसं/सिंव्य/लाक्षेवि/लपा/जवि),यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर.
१८) कार्यकारी अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे विभाग (दक्षिण), कोल्हापूर.
१९) वित्त विभाग ( व्यय-१२/ अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२१) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

## हिरण्यकेशी (आंबेओहोळ) मध्यम प्रकल्प, तालुका आजरा, जिल्हा कोल्हापूर
### उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा
**शासन निर्णय क्र. सुप्रमा-२०१७/६५०/( प्र.क्र. १९७/१७)/ मध्यम प्रकल्प दिनांक ०४/०२/२०१९ चे सहपत्र.**

(किंमत रुपये कोटी)

| उपशिर्ष | प्रथम सुप्रमानुसार तरतुद | द्वितीय सुप्रमानुसार तरतुद | वाढ / घट (+/ - ) |
|---|---|---|---|
| अे - प्राथमिक | ०.२२ | ०.२४ | ०.०२ |
| बी - भूसंपादन | २०.८३ | ९९.५८ | ७८.७५ |
| सी -कामे | ६९.५९ | १०९.८४ | ४०.२५ |
| डी - विमोचक | ४.३२ | ६.८० | २.४८ |
| के - इमारती | ०.१९ | ०.१० | (-)०.०९ |
| एम - वृक्षारोपण | ०.०६ | ०.०५ | (-)०.०१ |
| ओ - संकीर्ण | ०.२० | ०.२० | ० |
| पी - देखभाल | ०.१९ | ०.५२ | ०.३३ |
| क्यु-औजारे व संयंत्रे | ०.०९ | ०.१७ | ०.०८ |
| आर - दळणवळण | ०.०८ | १.५३ | १.४५ |
| **एकूण कामे** | **९५.७७** | **२१९.०२** | **१२३.२५** |
| **आस्थापना, संयंत्रे व इतर खर्च** | १९.१६ | ८.५२ | (-)१०.६४ |
| **प्रकल्पाची एकूण किंमत** | **११४.९३** | **२२७.५४** | **११२.६१** |

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: CN = Dharane Mallikarjun Irappa, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2019.02.04 14:42:02 +05'30'

**(म.ई.धरणे)**
शासनाचे उप सचिव